सन्देश !

स्तम्भित पळभर, अुठे धीर धरुनीयां,
मन्दमन्द ये मत्सन्निध निरखाया;
ओळखितां, धरि हातें कापरी अधिरी...
आणिक बघते नयनिं काय शोधाया ?

परि नच अुमटे मुखांतुनी मुळिं बोल;
वेडिपिशी पाहते मुखास अबोल !
अन् दुसऱ्या पलिं धरुनि करीं मम वदना—
टेकि कपाळीं दिनवाणी स्वकपाल ! !

वर्षी अश्रू;—अकाल वर्षा जैसी
रिता होअितों घन, भिजवी सृष्टीसी ! !
अन् मग होई सन्थ;—समुद्रीं नौका
नीर अुपसतां जशी तरङ्गे, तैसी ! ! १९२

२ 

# मन्त्रणा

*मन्द मन्द वायु वहे परममोहक,
गन्ध मधुर दरवळतो कुञ्जसुमांचा,
रजनी पसरे प्रशान्त आणि नादतो
धीरशब्द दुम्‌दुमसा सागरहृदयीं—
परि माझ्या हृदयींच्या क्षुब्धसमुद्रीं
प्रलयोर्मी धडकति अन्‌ खडक भाङ्गती
घुसताती वेळेच्या आंत; कारण
अशी ही विकल सखी भीता हरिणी ! !
केंवी तिज साङ्गूं मम पूर्ण निश्चय ?
अन्‌ कैसी मिळवुं तिची स्नेहसम्मति ?

धरिते मम कर हृदयीं दाबुन; सोडी
अुच्छ्वासा मन्द, परि बोल न बोले !
जाणियलें, केंवि करी तो "सन्देश"

* जाति : वैनायक ( धवलचान्द्रिका )

संवेदनजनित तिची पूर्वसिद्धता
अैकाया, सूचित जें प्रथम तें स्फुट
माझ्या शब्दांतुन; ती कर्तव्याज्ञा,
तत्त्वपालनार्थ वा अवश्य ती कृति,
अथवा तो हविर्भाग म्यां द्यायाचा
धगधगत्या सर्वभक्षि हवनाग्नींत. २११

आजदिनावेरीं तीं कमलकोमला
प्रियतम मत्प्रेयसीच सतत निर्झर
होती मम अुत्साहा; वादविवादीं
अतिनिपुणा मम रमणी, पटु संवादीं,

कलावन्त, रसिका अन् परमतीक्ष्णधी
तर्कशुद्ध बुद्धिवाद करि; परी खरी
प्रागतिका; संवर्धित बाल्यि सुखांत;
नच शङ्की प्रौढावस्थेंत विपत्ती
(—जरि न विपत्ती मजला, तिजसि निश्चित !)
ओढवेल आकस्मिक !...होअिल का ही
सुकुमारा अैकतांच वज्रकठोरा ?
धैर्याचा मम अखण्ड ओघ; जशी ती
काव्याचा जीवनांत ? जीवनान्तही
मम सोशिल का ती त्या समवृत्तीनें ??

मीहि स्तब्ध चिन्तनांत, आणि स्तब्ध ती,
स्तब्ध बाग, स्तब्ध खोल अम्बर, मात्र
नाद घुमे क्षितिजान्तरिं नीरोमींचा;
तों करिते ‘ टिट्‌ टिट्‌ ’ टिटवी भरारत
जाते अति दूर, तधीं नाद तिचा तो
विरत विरत गम्भीरवि वातावरणा.

तैं कर्णीं पुशिलें मीं हळुंच " प्रियसखी !
कां अबोल ? साङ्ग मला कारण !..." परि ती
टेकी मस्तक पुनरपि हृदयावरती,
अुघडुनि हळुं नेत्र, पुन्हां मिटुनी बोले :
" तोडियली कक्षेंतुनि तारका ग्रहें
प्रिय, न देखिली ?..." नि पुन्हां स्तब्ध होतसे;
अनिर्वाच्य अन्तर्गत गूढ वेदना
मूक करी मम बुल्बुल मधुर बोलका. २३९

( म्हणुनी नच काव्यमयी अुपपत्ति तिच्या
अपशकुनी शङ्केची तिजसि सुचविली
कीं, न तुटे तारा ती विमलाकाशीं;
तो चमके दृष्टिपात परावर्तित
नील खोल अम्बरांत चमकुनी जधीं
देखिलेस मज. तेव्हां केंवि कथावें ?
कैसा अुत्सह यावा ? होअिल का त्या
ध्रुवप्रान्तसंशोधक नौकापतिला
—कितिहि जरी अुत्सुक तो पाहुन घ्याया
रम्य अुषा व्यजनाकृति भव्योदात्त—
महानन्द, जैं गवसे हिमगिरीतळीं
अन् जीवन नसतांना शाश्वतीमधें ? )

म्हणुनि सरळ सम्बोधुन तिज वदलों मी;
" आलों मी, सखि ! करण्या तुजसि मन्त्रणा;
तव विचारभावांना समजुनि घ्याया
अेक महा प्रश्नावरि !...अन् तूं अैशी
गूढ, खिन्न, वचनहीन कां न बोलशी ? "

" मद्विचारभाव ?...खरें सांगूं ?...रमणी
सर्व मृदुल तत्त्वांची अेक मूर्तिशी,
मेणाची जणुं पुतळी वा लोण्याची
रखमाओी मूर्तिमती ! ! भूमिका तिची
जीवनांत अेवढि, कीं पतिकार्यांत
जेथ कृती, कर्तव्यें, प्राणदान वा
आवश्यक–अडवणूक तेथें करणें
घाबरुनी, प्रगतिपथीं पति जातांना
गतिनिरोध प्रतिगामी करणेंच अशी ! !
मग कसली मन्त्रणा नि भावना मम
अुपयोगी होय तुला, प्रिय, खरोखर ! ! " २६७

श्रवुनी हें वच विषण्ण मी अुत्तरलों,
" नित्यरूप जीवनांत प्रीति-भक्ति अन्
करुणा हीं सतत राहणेंच अवश्य !
अैशा या नित्यरूप जीवनकार्यीं
मूलभूतकार्य करी ललना, नर ते
नैमित्तिक कार्यीं आकण्ठ बुडुनियां
विस्मरती भव्योज्ज्वल अत्युदार ती
गङ्गोत्री क्षान्ति-शान्ति-सन्तोषमयी
हृदयींची रमणीच्या दिव्य पवित्र ! !
हें झालें अेक सत्य; आणिक सांगू... ?
कोण अधिक जाणतसे गुणदोषांसी
पुरुषाच्या, आणिक तच्छक्ति अनेक,
तितुकीं, जितुकी सहानुभूत प्रेयसी

जाणितसे ? " " सत्य तुझें वच; परि, प्रिया !—"
वादनिपुण मूळरूप बोलतें अतां—
" तत्त्वांस्तव झगडति ना पुरुष ? मग तयां

अनवश्यच हें सारें निष्कामांना ?..."
" तत्त्वांस्तव निश्चित ते करिती झगडे !
परि त्यांच्या तत्त्वां जन साधारण ते
हेटळती, नुमजुनि तीं गम्भीर किती,
शाश्वत किति, आणिक निज तत्त्वीं त्यांची
किति अभङ्ग भक्ती; मग अेकलकोण्डे
तत्त्वांच्या कण्टकमयमार्गि प्रवासी
धुण्डळती कीं, कुणितरि व्यक्ति जगतिं या
जाणत कीं खरि अपुली योग्यता ? तश
प्रेममयी मूर्ति अुभी चक्षुंसमोर
कोणाची अचलनेत्र ?...म्हणुनियां, सखे !
त्वद्विचार अैकाया अुत्सुक झालों ! !" २९९

यावरती प्रत्युत्तर ना दिलें; पुन्हां
ती विषण्ण होत; शान्त बनत पळभर,
आणिक निज कम्पित वच खिन्ना बोले :

" वनलक्ष्मी रम्य रम्य सृष्टि पांघरी
वरुनि प्रिय ! परि हृदयीं ?...धरणीकम्प
चालति; तें लाव्हाचे बसती चटके;
अन् जाते भेदरुनी; तें पृथ्वीचे
नगपुङ्गव दुर्भङ्गति तुङ्ग पलांत,
अन् विनाश मात्र विकटहास्य खिदळवी ! !
...धडधडतें हृदय किती अैक; ...ही तुझी
'शान्ता' हृदिं कम्पित कां ?... आज देखिलें
जागृतींत स्वप्न; कधीं वदत शशिकला ?
ती वदली आज !—वदे हा गुलाब कीं
मनुजवचीं ? परि तोही आज बोलला—
शुभ किंवा अशुभ मी न जाणतें; परि

निश्चित तें द्योतकसे आपातांचे
भावी... ती आपत्, प्रिय..."  आणि सङ्कुला

शहारून नेत्र मिटी, स्तब्ध क्षणिं बने,
आणिक मग पूर्ण शान्त होतसे,—जशी
बिजलीची चमक लागतांच किञ्चित्
झणझणते सर्व तनू, अणुरेणूंत
सणसणते वीज, आणि मग जातां ती
विगुनीयां वृत्ति बने; तेंवी शान्ता
साङ्गे वृत्तान्त सर्व, दाखवी सुमा,
आणि शेवटीं वदते : " प्रिय, जरी खरें
तात्त्विक तव चिन्तन; तरि चिन्ता वाटे
कैंवी त्वत्कार्य राष्ट्रमोचनात्मक
अप्रतिहत सफलहेतु होअि, न येतां
तुजवरती सङ्कट, अडचण नि अडथळे..."	३२४

भीति तिची सार्थ असे, स्नेहसहज ती;
परि तिजला पर्यायें अुत्तर दिधलें :
" घनतिमिराक्रान्त जधीं विश्वजननिला
करायास मुक्त, सखी ! चन्द्र प्रयते,
जें थबके क्षणिं, दुसऱ्या मार्गं आक्रमी,
वळुनि क्षण तीक्ष्ण दृष्टि फेंकि चहूंकडे;
तैं पुढतीं अुदयाचल 'आ' वासुनियां
गिळण्याला वीराला सिद्ध ठाकतो
परि येतो निःसङ्कट अम्बरशिखरीं
लाम्बरुन्द मेघांच्या चढुन पायऱ्या;
' हा प्रियकर ! चढ, चढ, चढ; तिथुं नको वा ! !
दुष्ट नष्ट पापी तुज टपति धराया...'
या अधीर शब्दांनीं प्रार्थी पूर्वा

परि तिकडे त्यास हंसे कोण तमांत ?
‘ मूढ चन्द्र चढतो हा अचल कासया
फुकट मरायास ! ’... असें बोलबोलुनी !
रातकिडे कुजबुजती—मूर्ख ठरविती,
घुबडेंही दोष देत दांत चावुनी;
परि रविनें क्षुद्र अशा वीर कां अडे ?
तो चढतो भर भर भर मातृसमीप...
“ सर्पांनीं प्रिय माता गांजिली, असें
पाहुनियां वीर विनायक निघे रणा;
हरुनि जधीं दिव्य सुधा मोचिलें तिला
काय तधीं सङ्कट त्या गरुडा नव्हतें ?
उच्च भव्य गृह; सभोंवतीं पुन्हां उभे
सायुध अन् सावधान रक्षक; तेथें
सुधापात्र ठेवियलें अज्ञातपणें
देवांनीं लपवुनि सर्वोच्चतलांत;
परि हा जैं गरुड चढे गृह क्षणामधें,
वातायनिं आंत शिरे, हरि सुधा मधु,
कोण तया भिवविण्या समर्थ जाहले ? ”

“ आणि यदा घेतियली झेप वानरें
लङ्केवरि सीतेच्या शुद्धिकारणें,
शिरला निर्भीक वासल्या मुखामधें
राक्षसिच्या; कोणि तदा भिवविलें तया ?
म्हणुनि, सखे, भीति नसे जें जन करिती
भव्य तत्त्वजन्य कार्य, अर्पुनी तनु ! ”

गोड झुळुक वाऱ्याची थण्डगारशी
वाहुन ने क्षुब्धतेस आणि करितसे
वातावरणा हलकें, डुलवितें कसें

तें गुलाबपुष्प, निळ्या पार्श्वभूवरीं
हृदयङ्गम छायाकृति निर्मिली तयें.
उठली शान्ता त्वरेंत, जाअि फुलाशीं,
आणि तिची छायामय पुसट आकृति
खुलवितसे त्या दृश्या—कीं, अरुन्धती
झुन्जुमुन्जु उठुनी या उत्तरध्रुवीं,
हिमसीत्कारांत जणूं नाहत जाते
वेंचाया तरल उषापद्म; सिद्धता
करिते सप्तर्षि तपःसाधना सती,
ती जेंवी विधुवाहुन अस्फुट दिसते,
तेंवी दिसते शान्ता, निरखिते क्षण,
अन् खुडिते तो गुलाब; हळुं मग वळते
मत्सन्निध, ये समोर, ओणवी बने,
अन् अर्पी, अश्रुंसवें, पुष्प तें मला.
“ कार्यास्तव जात तुम्ही; आठवण तिथें
ही माझी प्रिय...” अितुकें सद्गदित वदे
अेक निमिष; परि शान्ती किति विलक्षण
पसरत त्या बागेवर ! मग गृहाप्रति
जातां, किति मिश्र भाव, मिश्र विचार
मानसांत चमकुनियां गेले; जैसे
अम्बरांत तारकगण विविध तरळती
असम्बद्ध-अगणित ! परि तेज तयांचें
कुतुकास्पद; तैशी मम वृत्ति जाहली,
कारण कीं प्रिय सखिनें अनुमती दिली,
पुष्परूप शक्ति दिली, आणि दाविली
भारतयुवतीसहजा त्यागवृत्ति ती !

## ३ — बन्दिवास

*अन् हांकेला अुतरुनि रणा राष्ट्रभूभक्तिरङ्गा,
मीही योद्धा बनुन शिबिरीं जात निर्बन्धभङ्गा;
निःशस्त्रांची रणकुशलता आत्मसामर्थ्यनिष्ठ
होती तेव्हां करित जगतीं स्वप्रयोगा विशिष्ट.

प्राजक्तीचा बहरत जधीं वृक्ष वर्षाऋतूंत,
मोत्यांसी जें बरसत असे मेघ मल्हारतृप्त,
गौराङ्गीनें सुमन-चिति तें गौरिपादीं वहावी,
स्वातन्त्र्यश्रीपदिं युवसुमां भारती अर्पि तेंवी !

स्वातन्त्र्याचा धुमसत तदा सागरीं वाडवाग्नी,
तो दावाग्नी भडकत जळे गर्द रानीं अरण्यीं,
—त्या ह्या हातीं जळति ठिणग्या, भग्ननिर्बन्ध मीठ,
—त्या ह्या शाखा वसति करिं या, रान सत्याग्रहांत.

* वृत्त : मन्दाक्रान्ता

मीही माझ्या शिबिरिं बनलों सर्वसत्ताधिकारी;
स्वातन्त्र्याची तळमळ जगीं सर्व सत्तेस भारी !
केला सत्याग्रह झटुन मीं; जाहलों बन्दिवान
न्यायाच्या त्या प्रहसनिं मुळीं घेतला भाग मीं न !

दो वर्षांचा श्रमसह मिळे पाहुणेचार, कारा;
दो वर्षांचा विरह सहणें स्नेह सोडून सारा !
दो वर्षांचा विरह, परि तो त्या क्षणीं 'सान' भासे—
शान्ता जेव्हां परत वळतां धीर तें हास्य हांसे ! !

शान्ता जाते परत—! चमके तों स्मृती तीव्रवेगें
" शान्ता, राही क्षण अुभि–" वदें मी, नि हस्तीं करां घे;
" ठेवी ही तूं जपून, सुहृदे, ठेव...ही मङ्गलेच्छा—"
—प्रीतीसङ्गें धरिं करिं गुलाबाचिया स्नेहगुच्छा !

धीरा शान्ता करि मजकडे विस्मितालोकनाला;
अैशी पाही क्षण, मग बघे त्या प्रतीका–सुमाला !
तन्नेत्रींच्या स्फटिकतरला गूढगङ्गोत्रिदेशीं
सम्मिश्रोर्मी अुमटवि किती भिन्नवर्णच्छटांसी ! ४१८

गेली शान्ता...! परत कधिं ती भेट...? तीं दोन वर्षें
कारावासीं, मग...!! परि करीं वासना दूर रोषें !
आसक्तीशीं झगडत करीं मी अनासक्तियोग,
तों आसक्ती प्रबलच करी रम्य ते काम्यभोग !

झालों मुद्राङ्कित मग तिथें बन्दि कारागृहांत,
कारावेषीं सजुन बसलों त्या क्रमाङ्कासमेत !
लागे 'नारायण' अडकतां गर्दभाच्या पदाला
साधा कैसा 'नर' मग सहे मर्कटांच्या न लीला ?

होत्या तेथें विविध प्रकृती मानवी मानसाच्या,
तेंवी होत्या विविध विकृती पाशवी कामनांच्या;
...मीही झालों समरस पुरा त्यांचिया सङ्गतींत
छोटा-मोठा विरत सगळा भेद त्या रौरवांत !

ज्यांची "मोठे" समजुन जनीं आरती भव्य केली,
त्यांची कारागृहिंहि चलते ती "अ" वर्गीय "केली"
अन् ज्या आम्ही अहह ! गणिले जन्तुसे हीन-दीन
ते श्रीमन्ती हृदयज किती दाविती भावपूर्ण !

ऐशी विस्मायक अुभि दुजी सृष्टि दृष्टीसमोर;
दृश्यें दावी किति तरळ ती अन् भ्रमां नेत दूर !
नीति-न्यायीं यमनियम, तीं पुस्तकी धर्म्य कर्में
सारीं येथें अुलटति, खरीं दाविती मूळ वर्में !

गेली माझी समज—किं तयां हीन लोकां न नेकी !
आली आतां अुमज—न अम्ही अेकटे शिष्ट लोकीं !
या कारेच्या नरकिंहि तरे श्रेष्ठ मानव्य भव्य—
कीं आमेच्या तिमिरिं तुटती तारका दीप्त नव्य !

ब्रह्मर्षी जे बनति सकलज्ञानविज्ञानवन्त—
कान्तारीं ते वसति, तरिही जाणती लोकतन्त्र !
तेंवी जाणें 'विकृत' मन मी तेंवि मानव्य 'सत्य'
कारावासीं पिचत करितों जें निरीक्षेस नित्य !

चर्चा चाले विविध विषयीं लावुनी भिन्न कोन
हिंसाऽहिंसा, असह-प्रति अन् शस्त्रयोगांवरून;
स्त्रीस्वातन्त्र्यीं, नि जड-समतावाद, आस्तिक्यवादीं
साहे कष्टा तनु, परि रमे बुद्धि नाना विवादीं !

कारावासीं क्रम सतत हा; तेथ ना स्वैर वारें;
होतों आम्ही जगत विजनीं जीवना अेकसूरें;
मण्डूकांसी विपिनिं डबकें ( जीर्ण, कण्टाळवाणें )
वाटे मोठें परि करिति ते ड्रॉव्-ड्रांव् अुत्सहानें !

त्या जीवांसी पण खचित ये सम्भ्रमाचा प्रसङ्ग,
कोणी हौशी करि जधिं तिथें भोजनासी खमङ्ग !
तेंवी येथें खळबळ अुडे जैं नवे बन्दि येती,
जो तो होतो अधिर कळण्या गुर्हिच्या रम्य गोष्टी !

हर्षस्पर्शे खुलति कळतां कीं, सुरू युद्ध घोर,
नाहीं मोठ्या नगरिंच, परी गांवगांवीं सुदूर;
अन् आनन्दी बहु समजतां कीं, पुरन्ध्री-कुमारी
लाठीमारा सहिति, करिती बन्दिशाळेंत वारी ! ४६२

तों ये वेला मधुर, सकलां बन्दिनीं प्रार्थिता ती
आनन्दी तो दिवस अुगवे, ज्या दिनीं पत्र-भेटी;
अुत्कण्ठेनें प्रतिजन बघे वाट आमन्त्रणाची—
वा पत्राची कुणिकडुनच्या ?—रक्तरेखाङ्किताची ! !

मीही साधारण जन तसा बन्दिलोकांमधील
अत्युत्कण्ठा हृदयिं, न सुचे काम जात्यावरील;
कोलूदाण्डा कुरकुर करी अन्दमानीं-न वीर !
ठेवी वृत्ती सम कधि तदा !—अन् रची काव्य थोर... !

कम्पे हंसी जळजदलिं, तों मानसीं कम्पमाला,
वृत्ती तेंवी हार्दि अुमटवी भावुक स्पन्दनाला;
'येअी शान्ता प्रियसखि— ?' मनीं लागली ओढ गूढ
'येअी कान्ता न जरि तरि तत्पत्र काव्यात्म गोड— ?'

नाहीं आली !...परि मज मिळे पत्र तीच्या करींचें;
होतें का तें रसमधुर नी दीर्घ त्या प्रेमलेचें ?
होतें ना तें प्रणयि, तरिही स्नेह होता भरून,
सारें होतें तुटक, तरि तें गूढ तत्त्वार्थ पूर्ण !

असें भासे द्विविध मजला—'साश' आणी 'निराश'!
सन्तोषा दे मतिस, करितें अन्तरासी अुदास !
अिष्टा वार्ता, परि हृदयिं का वाटते ती अनिष्ट ?
मी योद्धा तो अचल, अथवा कोणि दीन भ्रमिष्ट ?

पत्रीं बोले :
"प्रिय,
तव अशी ध्येयभक्ती बघून
वाटूं लागे, सहचरि तुला योग्य व्हावें म्हणून,
त्यागूनी हें सुख, तुजविना दुःखसें भासतें जें,
व्हावें अुल्का क्षण चमकुनी त्या ग्रहायोग्य तेजें !

आशीर्वादा मजसि, प्रिय दे, कीं जयें धीर येअी
अन् कर्तव्या निज विपदिंही मी न सोडून जाअीं.

तूझी,
कान्ता,"

—(परि मग लिही वाक्य हें 'लेखनान्ता')
"वाटे चिन्ता प्रकृतिविषयीं तूझिया मात्र !

—शान्ता."

चिन्ता वाटे प्रकृतिविषयीं माझिया—आणि, शान्ते !
चिन्ता कां ना प्रकृतिविषयीं आपुल्या ?...साङ्ग कीं तें ?
पाषाणाची प्रकृति मग ही वांचुनी काय अर्थ ?
—अन् पुष्पाची प्रकृति तव ती कोमजूनीच सार्थ !

शैलेन्द्राचें सुभग सजवी शृङ्ग सन्ध्या सुवर्णा—
अेक्या पार्श्वी; परि अह ! दुज्या काळरात्री कभिन्ना !
—किंवा कण्ठस्थित खवलयें अिन्दुचें बिम्ब साजे
जें कीं मेघें परि फिकटुनी काळवण्डे अतेजें !

तेंवी चाले तअिं मम मनीं-जीवनीं द्वन्द्व तीक्ष्ण
ध्येयाकाङ्क्षी मन ' अुमलतें, ' भावसम्बद्ध...' खिन्न ' !
ध्येयासाठीं झगडत जसें जन्मसाफल्य साध्य
त्याच्यासाठीं विफल बळि हो जीव यज्ञीय वध्य !

वृत्ती अैशी विकल जधिं मीं उत्तरा पाठवीलें,
नाहीं पूर्णा अनुमति, न वा मीं विरोधास केलें;
...कार्यासाठीं कठिण धरिला मार्ग जो तोच डङ्खी
' शान्ता ' कष्टे म्हणुन ! !—हळवें प्रेम हें प्रेमिदुःखीं !

" शान्ते, सौख्यीं सम जरि तरी दुःखकार्यींच कां न ?
या तत्त्वानें अनुमति पुरी द्यायची मोदपूर्ण...!
होते आहे परि विचल ही वृत्ति, गे, भावभूकी !
...किंवा कम्पे हृदयिंच अतिस्नेह हा पापशङ्की ?

" जो विज्ञानें गतिमय, असा मङ्गळा बाण लक्षी,
तो अज्ञानें परि परततो बावरा मूळदेशीं...
वैकुण्ठासी गमन करण्या आङ्गणीं ये विमान,
तें खुण्टासी बसुन दळणें धान्य 'जीजे'स मान्य !

" कार्यीं हो तूं रत;—परि, प्रिये, रूप त्याचें दुहेरी;
आधीं विध्वंसन, विरचना मागुनी देशकार्यीं !
जैशा वृत्ती द्विविध, तशि ही लोकिंची कार्यनीति,
साधी प्रेमप्रकृति ' रचना ', ' ध्वंसना '—क्षोभवृत्ति.

" ती तूं साधी शुभ विरचना ती तुझी कार्यकक्षा,
सन्तोषानें मन वळविणें जाणते मात्र योषा !
पाया खोदी नर, मिळवितो लांकडांना, खडीला
नारी देते परि विरचनें हृद्यता मन्दिराला !

" साधाया ती जरुर रचना, प्रेमले, त्वां झटावें,
अन् सन्तोषा मनिं मिळवुनी कार्यतल्लीन व्हावें—
ही शुद्धेच्छा सतत मनिं जो बाळगी तो

तुझा मी,
स्नेहाकांक्षी,
विजय. "

—तिचिया धाडिलें पत्र नामीं !

वेळोवेळीं पुढतिं मज ती कार्यवृत्तें निवेदी,
ग्रामोद्योगी, हरिजनगृहीं ने विकायास खादी !
गुरुयाभोंतीं सविनय करी ती निरोधा शुभाङ्गी—
कैसा आला अनुभव तिला त्या विचित्र प्रसङ्गीं—!

अेका पत्रीं लिहि :

" विजय;

मीं काय वृत्तें लिहावीं...!
आकाशाला गवसणिच ही !...नोहती मात्र ठावी !
आरम्भाला किति तरि–तुला साङ्गुं–अुत्साह होता
पावे नाशा हळुंहळुं...करी क्षोभ निर्माण चित्ता !

" स्त्री-सामर्थ्यी, प्रिय, तव असे पूर्ण विश्वास-नाहीं ? "
( मर्मस्पर्शी हळुंच मजसी टोमणा मात्र देअी ! )
" त्या शक्तीशीं परि नर कशी वापरी ! बाअि शर्थ !
स्त्रीशक्तीशीं शह कपटि दे स्त्रीस योजून धूर्त !

“ जो दे ज्ञानामृत बहुजनां दारुबन्दीसभेंत,
ठेकेदारा गुपचिप अृणा तोच सव्याज देत !
ते पेण्ढारी !—मिरविति परी ते पुढारी समाजीं
दारूवाला रतिब पुरवी ठेविण्या त्यांस राजी !

“ पोळ्यामध्यें मिळवित मधा आयती माशिराणी,
वेश्या तेंवी फसवित जनां मञ्जुळा नाम कोणी;
आस्कन्दी ती मदिरनयना मत्त त्या मद्यप्यांस
जें मी त्यांना विनवित हळूं मद्य सोडावयास !

“ निर्मूनी ती सुरस मदिरा, मोहिनी रक्षि देवां,
देअूनी ही विरस मदिरा भोगिनी भक्षि सर्वां !
‘ दारू सोडा ’—हितवच कटू हें रुचे का कुणास ?
‘ दारू जोडा ’—म्हणुन विनवी कामिनी जैं सहास !

“ अैसी आहे स्थिति अिकडची !—कां न वाटे निराशा ?
कर्तृत्वाचा विजय असुचा ?—लोक मानी तमाशा !
शान्ती, प्रीति, मृदुसरलता, तें सहिष्णुत्व थोर
साक्षेपत्वें विफल ठरलीं त्या पशुत्वासमोर...! ११४

“ जाअूं या तें, प्रिय, प्रकृतिची काळजी वाटतेच !
कैसी आहे ? कळव, जपुनी वागणें,

मी तुझीच,

शान्ता. ”

—चिन्ता करिशि अजुनी ! पात्रता काय माझी ?
विश्वोद्धारा झटुन करिशी !—थोरवी ही स्त्रियांची ! !

कारावासीं हळुहळु असा मी स्थिरावें, न दुःख;
तोंची झाला अवचित कसा घाव मर्मी अचूक !
शान्ता ! हाः रे ! विकल पडली मृत्युच्या आन्थरूणीं
राही सारा अडकुनि तिचा जीव माझ्या ठिकाणीं !

कान्ते, रात्रन्दिन न थकतां तूं प्रचारार्थ जाशी,
थण्डी-वारा गणिसि न, नसे काळजी पाअुसाची !
दिव्योत्साहा जरि न पडती भङ्ग या कारणानें
मर्त्या देहा परि जखडती व्याधि त्या आकसानें.

जैसा वैरी भर मुदतिचा ताप दे नित्य भूला,
तैसा घेरी ज्वर मुदतिचा घातकी मत्प्रियेला !
शान्ता होते पिचुन मरणासन्न—तैं अेक आस,
भेटायासी मज बघतसे जीव वाटेकडेस !

होती थोडी मुदत अुरली बन्दिवासामधील;
मीही पाळी नियमित सदा दण्डकां बन्दितील,
बाहेरूनी बहुत सुहृदें यत्न केला, म्हणून
भेटायासी तिजसि मजला ये अनुज्ञा लिहून !

मन्त्री कोणी भुजग धरुनी सोडितां मन्त्रमुग्ध,
जातो कैसा सरर... निमिषीं वारुळीं स्नेहबद्ध !
होअी का त्या सुख जधिं कळे त्यास —'आतां भुजंगी—
'—कोणी शत्रू विकळ करितो तीस ठेचून आङ्गीं' !

तेंवी, व्हावा मजसि कसला हर्ष त्या मुक्तिमध्यें !
शान्ते ! शान्ते ! ! अहह ! कशि गे ही दशा ये सुबुद्धे !
माता जातां, प्रिय, तुजमुळें पोरका जाहलों न,
ती तूं जातां खचित अुघडा मी पडे प्रेमहीन !

होती शुद्धी, शयनिं जधिं मीं देखिली पुण्यशीला
शान्ती नेत्रीं अचल, वरिते गूढशा भावनेला;
पाही, अन् ‘या’ खुणवुन म्हणे, वांकलों मी तियेशीं,
घेतें हातीं निज —किति, अरे ! क्षीण तो— मत्करासी !

“आलासी, हं विजय ? प्रकृती कैंवि ?... हो मोकळीक ?
हें घे...” ऐसें म्हणुन करिं दे तें गुलाबी प्रतीक !
ठेवी हाता निज अुरिं...! मला हुन्दका आवरे न...
...हा, रे, दैवा..., मजसि न अुरे भान, मी शक्तिहीन !

४

## दर्शन

[ १ ]

* ही अवसेची पसरे रात्र भयाण
भुवनास करी काळेंकुट्ट तमानें
बघ दाहि दिशा सुन्न होउनी गेल्या—
जें हृदयींची विरलीं तेजःकिरणें !

त्या अनन्तशा खोल नील आभाळीं
घिरट्या घाली घन तिमिराचा मेघ;
त्यामागुनियां अस्फुट दिसतें कांहीं—
कीं मालवत्या तारांचा अुद्वेग ?

मम जीवनही घेरियलें अवसेनें,
ना तेजाचा लेश दिसे दृष्टीस,
वादळ सुटतां, नभ गिळतां अन्धारें
ध्रुव-तारेची खूण न नावाड्यास.

* जाति : जगदीश्वरबाला

आकाङ्क्षांचा विझे तारकापुञ्ज
भवितव्याच्या वातहीन गर्तेंत !
जैं विरत असे शोकगीत हंसाचें
हेमन्ताच्या करुणान्तिक कहरांत !

वनराजींनीं शोभिवन्त गिरिमाला
काळोखाच्या टोळधाडिनें गिळिली :
मधु अमृताची धार कुणा राहूनें
फुसलावोनी गट्ट करुनि टाकियली !

तत्कण्ठि परी अस्फुट रेषा अुमटे—
अुमटे तेंवी पुसट रेघ दिक्प्रान्तीं;
ओहट वळतां सागर जातां खालीं
जणुं फेसाची रेघ किनाऱ्यावरती;

मम सत्कृतिची रम्य सुभग सुममाला
अन्धूक दिसे काळवण्डुनी जातां—
त्या "भूता"च्या अगम्य विस्तारांत
विस्मरणाची दारुण पटलें पडतां ! ६१८

मी अेकाकी भटकें रानोमाळ
तिज शोधाया "लपण्डाव" करतांना
परि काळोखें जागा नच ठेवियली,
मज शोधाया किंवा तिजला लपण्या !

मी भेदरतां सुटतां कम्प अपार,
तूं येशिल गे, द्याया धीरा मजला
म्हणुनी गेलों भयाण मसणवटींत
ना परि वाचा अेकाहि पिशाच्याला !

ती येथि अुषा  हंसत हंसत ? वा रक्ता ?
ना रङ्ग तिथें  हास्य न वा खुलवीते;
मज गमली ती  कारुण्याची मूर्ती
मच्चित्ताला  शमवायासी येते !

जो काळोख्या  कोठडींत अन्धाऱ्या
गेलों होतों  गाडियला निपचीत—
तो रविरूपी  सांपडलों आगीच्या
'आ' वासुनिया  धगधगत्या खाअींत !

तारुण्याची  करपुनि जाय नव्हाळी,
भुवनान्तरिची  हरुनी नेली शान्ती;
अति तापानें  भाजुन जात तनुलता
अन् आंसुसुधा  आंत सुकोनी जाती ! ६३८

[ २ ]

*मग "दर्शन" जाहलें; तधीं
शशिकोरीवरि लोल बैसली;
विहरे ललितोत्सवीं प्रिया
जणुं नौकेवर खेलना करी.

अधरीं मृदु हास्य नाचवी
पसरे तों वसुधेवरी सुधा;
नच चन्द्रकला;—कलावती—
शमवी मुग्ध चकोर-संक्षुधा.

* वृत्त : वियोगिनी

हंसतां क्षण नेत्र कम्पवी
तिथुनी ज्योति अुडून अम्बरीं
अुडुरूप धरी सकम्प ती,
तरला हंसि जशी सरोवरीं !

अधिऱ्या नयनीं विलोकितां
पडली दृष्टि सतेज तारकीं
दिपली परि सान्ज-चान्दणी
दिसतां दीप्ति तिला प्रियामुखीं ?

करि "मङ्गळ" मङ्गला भला
म्हणुनी सोत्सुक पाहिलें तिनें,
परि रोषभरांत जाळुनी
खदिराङ्गार, बघे शुभानने !

अतिरोषभरांत ? तो कसा ?
क्षणिं 'अङ्गारक' गार कां पडे ?
श्रममूर्ति कठोर ती परी
अनुसूयाकरिं बाळशी रडे ! ६६२

अपकृष्ट तपें भगीरथें
गगनीं जी नदती नदी वहे,
तव धीर गभीर दर्शनें
सजली शान्तियुता सदुत्सहें !

चळतां परि अुत्तरेकडे
विनता दृष्टि अतीव जाहली,
अतितीव्रतपा अुमा, परी
विवहीं लोकसभेंत लाजली !

विनता काशि दृष्टि जाहली ?
कळलें; त्या ऋषिसप्तका बघे,
पडतां नयनीं अरुन्धती
नत झाली; नच कांहिं वाअुगें !

विविधाकृति दृष्टि ही तुझी
कधिं पूर्वी नच पाहिली, सखे !
मग आजच काय देखण्या
बहुरूपीं नटली, नटात्मके ?

परि अन्धुकशी छटा तिथें
अुमटे त्या अवलोकनान्तरीं :
विरहीच अचूक ओळखी
प्रणयी अुत्सुकता मुखावरी !

प्रिय ! अुत्सुक पाहसी कुणा ?
प्रणयाभिज्ञ खुणा विलोकिसी ?
विषमाङ्ग सुरङ्ग मण्डपीं
दमयन्ती निषधेश्वरा जशी ! ६८६

परि मीच विमूढ !...पाहते
कसली ती, मजला-जरान्विता...
पिचलों अपकालवार्धकीं...
तरि 'कामी' अवलोकितो 'स्व'ता ! !

करि दृष्टिस दूर देवते !
भिडतां ती मम दीन दृष्टिसी
अतिकारुणिके ! दयावती ! !
त्यजुनी स्वर् वरिशील भूमिसी ! !

विमले ! मळहीन अम्बरीं,
विहरो ती तव मूर्ति साजिरी;
जगतीं महती प्रभा स्फुरो
तव चैतन्यवती विभाकरी !

" करणें करणीय "—ही जिनें
मज कर्तव्यसुजागृती दिली
आजें तीच निमग्न चिन्मयी
ध्रुव-तारेसम त्रिश्वमङ्गलीं !!

प्रभुदर्शन सन्तजीवनीं
चिरकालीं स्फुरवीत चेतना
प्रियदर्शन हें तुझें, प्रिये !
मम जीवीं करि हर्षवर्षणा

सखि, जा, ...तव नौ तरे, पहा,
सजवी स्वागतरङ्ग पश्चिमा;
लहरीलहरीवरी तरो,
विहरो कीं गगनीं तिलोत्तमा !

* करुणभुवनगर्भीं जानकी घे विसांवा;
स्वसुतविषयपृष्ठा जाह्नवी होय लुप्त !
क्षणिं अकथित जाओ अूर्वशी स्वर्गलोकीं,
प्रियसखि मम तेंवी अन्तरालीं विराली ! ७१४

* वृत्त : मालिनी



# जीवनयोग

*सुभव्यशा अम्बररङ्गभूवरीं
अपूर्व चाले कुणि नाट्यदर्शन;
अदृश्यरूपें तिथही करी कुणी
प्रवीण अत्यद्भुत सूत्रचालन !

अमूप नानाविध तेथ भूमिका
स्वसूत्रयोगें नटवी नटेश्वर;
असङ्ख्य ताराग्रह आपआपुलीं
नियुक्त कार्यें करिती परस्पर.

नितान्त वर्ते तिथ अेकवाक्यता
अनन्त नाचे जरि भूमिकागण
स्फुरत्कणांची रचि रम्य पार्श्वभू
सहस्ररश्मी—परि दृष्टिआडुन.

* वृत्त : वंशस्थ

असङ्ख्य अुल्का, तुटत्या, स्फुलिंगशा;
सपुच्छ तेजोनिधि धूमकेतुही;
नटानटाला अनुरूप हो अशी
प्रकाशशोभा रचिती हिरण्मयी ! !

खगोलकांचें सुविशाल अम्बरीं
सुरू असे नाटक आदिपासुन
न चक्रनेमिक्रम बन्द राहिला
कधींहि; चाले प्रतिवत्सरांतुन !

खरें—! न त्यांनीं निजकार्ययोजना
स्वयें नियोजून कृतींत आणिली !
स्वलीलया गोल निसर्गशक्तिनें
अबुद्ध ते खेळविले महाबली.

परी स्वकार्यांतरिं दाखवीत ते
अपूर्व अन्तर्गत जी व्यवस्थिति—
तिच्यापुढें "अुत्तम जीवयोनिची"
दिपूनियां लज्जित हो विसङ्गति ! ७४२

अचेतनीं ही जर भव्यता वसे,
न कां वसो ही तर चेतनामधीं ?
अभिन्नता दाविति भिन्नतेंत ते
न कां समानान्तरिं ती दिसो कधीं ?

तशीच जी हो रचनासुसङ्गति
कनिष्ठ योनींमधिं गौरवास्पद
न ती "सजीवांतिल अुत्तमांतही"
दिसून यावी...! किति लाञ्छनास्पद !

अभङ्ग त्यांची किति अेकवाक्यता
कितीहि ते क्षुद्र असोत गोलक !
अपूर्वशी भासत अेकरूपता
कितीहि ते सान दिसोत कीटक !

लुटावयाला मधुला वनोवन
भ्रमे सगुञ्जारव मक्षिकागण;
नि शोषुनीयां मधु बिन्दुबिन्दुही
श्रमूनियां सन्तत आणिती गृहीं

लहान मुङ्गी— परि अेकसारखी
विलीन कष्टांत अखण्ड सोनुली !
कणें कणें अन्न टिपून आणते
कुटुम्बरक्षार्थ झटून वारुळीं

जधीं गहूं माजुन पीक लोम्बतें,
तधीं किती हर्षत पांखुरें मनीं !
रचूनियां लाम्बच लाम्ब माळका
सुसज्ज होती निजभक्ष्यशोधनीं

थवे रचूनी जळिं मासळी वसे
परस्परांना जरि भक्षि ती सदा !
रचूनि टोळी बळि टोळधाड ये
जरी करी भक्षणिं नाश सर्वदा !

विवेक यांच्यामधिं ना दिसे कधीं,
न बुद्धिसंयोजन कार्यकारणीं;
खरेंच—! त्यांचें जड सृष्टिसङ्गरीं
समूळ अस्तित्वहि नष्ट हो क्षणीं !

विवेक नाहीं, नहि बुद्धिचापल;
निसर्ग त्या मन्दमतीस चालवी;
तरी व्यवस्था, रचना, सुसङ्गति
किती तयांच्या लघुतेस शोभवी !

विकासकार्यीं नर-योनि राहिली
समग्रयोनींमधिं अुत्तमा, फुका !
बने कनिष्ठाहुनिही कनिष्ठ ती
भयाण संहारयुगांत हिंसका !

परस्परांना गिळतां दिसून ये
न मत्स्यसंघीं जितुकी भयाणता,
मनुष्यसंघीं तितुकी प्रतीत हो
स्वबन्धुघातीं अतिघोर हिंस्रता !

विनिर्मिताती जितुका महानल
खगोल अन्योन्यशरीरघर्षणीं—
तयाहुनी लक्षगुणें भयंकर
मनुष्य निर्मी निजलाभशोषणीं !

असङ्ख्य योनींतुनि हिण्डहिण्डतां
अपार पुण्यें धरि देह मानवी;
म्हणूनियां सन्तमहन्त वानिति
किती नराची अनुरूप थोरवी !

कुणी म्हणे होअुनि मच्छकच्छप
सजे नियन्ता हरि विश्वरक्षणिं;
तरीहि दावी निज भव्यता निकी
नरावतारें परिपूर्ण होअुनी ! ७९८

कुणी म्हणे हा प्रभुनेंच निर्मिला
निजस्वरूपावरुनीच अुज्ज्वल,
प्रतिक्षणीं जो स्मरवी स्मरोपम
जगत्प्रभूची स्फुरती प्रभावळ !

असा नटे जो परमात्मसद्गुणें
महाविचारी महनीय मानव;
तयेंच ना जागविला जगामधें
महाविकारी दमनीय दानव ! !

सबन्ध सृष्टींतिल सङ्गरामधें
विवेकयोगें स्थिर होय मानवी;
तया विकासा दिधल्या सुबुद्धिचा
विनाशकार्यीं विनियोग चालवी ! !

सुबुद्धिशाली मनुजें स्वबुद्धिनें
विकासिली ही अभिरूप संस्कृति !
विराट्स्वरूपी निजशास्त्र भौतिक
तयेंच नेलें परमोन्नतीप्रति ! ८१४

निसर्गशक्ती जरि चालवी सदा
तयावरी राज्य अनेकरीतिंनीं,
तरी नरें सृष्टिबलास लाविलें
मतिप्रभावें अुपयोगकारणीं !

समुन्नती साधुन भौतिकी, अहा !
चिदुन्नती साधिल काय जीवनीं,
स्वतन्त्र नी सुस्थिर बुद्धिजीवि हा
नरानरांतील समत्व लक्षुनी ?

विवेकमार्गें व्यवहार जाणुनी
परस्परांशीं सहकार साधितां
अपूर्वशी संस्कृति या जगामधें
नरप्रयत्नें स्थिर होय निश्चिता !

वसुन्धरापृष्ठिं विशाल वाढला
कबीरवृक्षापरि वंशवृक्ष जो
हळूहळूं हो विकलाङ्ग दुर्भंग—
युगायुगाच्या परिवर्तनांत तो !

फिरून फान्द्या लववील लाम्बशा ?
पुन्हां मुळ्या हा अनिरुद्ध लोम्बवी ?
अरे ! ! विकारी वणव्यांत पोळला
फुटेल का त्यास वसन्तपालवी ? ? ८३४

जिच्यामुळें साधित भौतिकोन्नति,
जियेमुळें जिङ्कित तो परिस्थिति,
तया निसर्गीय महान शक्तिनें
स्व 'बुद्धिनें' शोधित 'युद्धसाधनें' !

न जीवनींचे अनुबन्ध लक्षिले,
न पाहिलें विश्व समग्र दृष्टिनें;
निरुन्द सङ्कोच करून, आपुलें
विकासिलें जीवन अेकबाजुनें !

दुजें परी अङ्ग विकासहीन तें
जगांत संहारक होय भीषण;
सुरम्य सञ्जीवनरत्न दावुनी
जहाल हालाहल डंखि नागिण !

जिच्या प्रभेनें दिपती विलोचन,
स्फुरे अशी मोहकशी तडिद्द्युति;
न विस्मयांतून विमुक्त हो मन
असह्य तों भीषण घाव घालि ती !

सुधारसानें रसलें महाफल
मनुष्यमात्रास मिळेल भक्षणा,
म्हणून संगोपुन वृक्ष रक्षिला
तयें धरावें विषवृक्षरूप ना !

महानुभावी सुविवेकि धीरधी
जगास दावी शुभ राष्ट्रकल्पना,
दुरन्त आक्रान्त जगांत माण्डि ती
प्रमत्त मायाविनि साच पूतना !

स्वतन्त्रता अन् समता नि बन्धुता
जगीं अुभारी नव लोकसंस्कृतिः
नसे तियेचा अजि मागमूसही,
न जानकी !—रावण मात्र मातती ! ८६२

समग्र मानव्य धरून चिन्तनीं,
चराचरीं देखुन अेकरूपता,
न जोंवरी आन्तरराष्ट्र-जीवनीं
सहिष्णुता, तोंवरि केंवि शान्तता ?

अखण्ड विश्वांत अशान्ति नाचते,
जणूं नटे हे प्रलयार्थ भैरवी !
प्रकोपवी सर्व चराचरांतलें
विकीर्ण संहारक तत्त्व ताण्डवीं !

भयाण संहारलयीस साधुनी
विनाशरङ्गीं भवकालि रङ्गली;
परन्तु ती होअिल शान्त शेवटीं
मुलांचिया प्रेमरसेंच माअुली !

अुफाळल्या विश्वसमुद्रमन्थनीं
फिरे सुमेरू स्थिर कच्छपावर;
परन्तु हालाहल फुंकि वासुकी
पिअील तें कोण विरक्त शङ्कर ?

समग्र अङ्गीं निज जीवनांतल्या
अुपायसंयोजन ना जरी करी,
न साधणें त्या नवनिर्मिती कधीं
समाजजीवीं नरजातिला तरी !

जगांत नान्देल समृद्धिशान्तता
न शान्तिचा केवळ मन्त्र गाअुनी;
न साधितां जीवनिंच्या समन्वया
कशी वसावी समतोलता जनीं ?

जधीं 'अनासक्त' असङ्ख्य शङ्कर
सुसिद्ध कण्ठीं विषदाह साहण्या-
तधींच हा जीवनयोग शक्य हो
करावया ध्येयसमान साधना !

*          *

अहा ! सखे ! अम्बरचुम्बरान्तरीं
अकल्प्य होतां तव भावदर्शन,
अगाधशा जीवनसागरीं अुठे
अुचम्बळोनी भरती विलक्षण !

## जीवनयोग

अमूल्य सेवा तव बान्धवार्थ ती,
अभङ्ग ती ध्येयज भक्तिभावना;
तुझ्या कृतीची रचनात्म शक्ति ती
पुरी करी जीवनयोग कामना

तुझी महोदार अभङ्ग ती धृति,
तुझी मनींची, सखि, भक्ति कोवळी;
स्मरूनियां सन्तत पूजितों अतां
प्रतीकशी जीर्ण गुलाबपांकळी !

अनन्त हा जीवनपन्थ चालतां
अनेक होतीं परिवर्तनें नवीं,
जिथें जगत् हें क्षण दृष्टनष्टसें
कुठें तिथें मानवजीव थोरवी !

परी असें जीवन चेतनामय
सदैव कार्या स्फुरवील मानवा;
महान आदर्श कृतींत आणितां
मनास अुत्साह चढे नवानवा;

व्यतीत होतीं वरुषें हळूहळू;
अतीत तूं जीवनिची सवंगडी !
गतींत माझ्या करि वाढ जी अशी
स्मृतींत मूर्ती तव सारखी खडी ! !   ९१५

# परिशिष्ट १ लें

[ छंदोरचनाविषयक ]

**(१) संदेश :** यांतील जाति **वंशमणि** असून तिचा उपयोग स्वर्गवासी कवि माधव ज्यूलियन यांनीं 'उमर खय्याम'च्या 'रुबायां'चें भाषांतर करतांना केला आहे. **भूपति** जातींतील पहिल्या दोन मात्रा कमी केल्यास **वंशमणि** जाति होते. ( यमकरचना : अ अ ब अ )

**(२) मंत्रणा :** हा भाग **वैनायक** वृत्त म्हणून प्रसिद्धि पावलेल्या निर्यमक धांवत्या 'धवलचंद्रिका' जातींत आहे. 'महाराष्ट्र भाट' सावरकरांनीं तिचा उपयोग विविध प्रकारांनीं केला आहे. प्रस्तुत लेखकाच्या 'वैनायकवृत्तविचार' ( महाराष्ट्र साहित्यपत्रिका : एप्रिल, १९३८ ) या लेखांत त्याचें सांगोपांग विवेचन आलें आहे. मीहि मिल्टनच्या 'नष्टनंदन'च्या (पु० ४) निर्यमक भाषांतरासाठीं आणि '**विश्वमानव**' ( अप्रसिद्ध ) मधील खंडकाव्यांसाठीं याचाच उपयोग केला आहे.

**(३) बंदिवास :** कालिदासाच्या प्रसिद्ध **मंदाक्रांता** वृत्तांत हा भाग रचला गेला आहे. विवेचन, वर्णनौघ व विशेषतः संवाद यांचा उठाव या वृत्तामुळें फारच चांगला साधतो, म्हणून याची योजना करावीशी वाटली.

**(४) दर्शन :** (अ) याची समजाति **जगदीश्वरबाला** आहे. नेहमींच्या माहितींतील 'अक्रूर' जातींतील दिडका ( विषम ) चरण काढून टाकल्यानें ती साधते. करुणरसाच्या परिपोषाला ही जाति किती अनुकूल आहे तें रसिकांना माहीतच आहे. ( अ ब क ब )

(ब) याचें वृत्त **वियोगिनी** असलें तरी तें फक्त वियोगासाठींच योग्य आहे असें नव्हे. यांतील आंदोलनें कुठल्याहि उत्कट भावनेचा यथार्थ आविष्कार करतील अशींच आहेत. ( अ ब क ब )

(५) **जीवनयोग :** कालिदासादि महाकवींचें आवडतें **वंशस्थ** वृत्त यांत वापरलें आहे. 'कुमार-संभवा'च्या ५ व्या सर्गांत तर कालिदासानें या वृत्तामुळें कळसच चढविला आहे. येथेंहि गंभीर वातावरण, उत्कट भावना आणि तदनुरूप चिंतन यासाठीं तेंच सर्वतोपरी योग्य वाटलें.

# परिशिष्ट २ रें

[ आवश्यक वाटणाऱ्या कांहीं टीपा ]

**मथळा:**—"जीवनयोग" हें नांव कै. गुरुवर्य ग. ना. टिपणीस अर्थात् कवि "भालचंद्र" यांच्या एका कादंबरीलाहि दिलेलें आहे. पण त्यांतील व प्रस्तुत काव्यांतील विचार व वातावरण अगदीं भिन्न आहे. म्हणून नामसादृश्यामुळें कुणीहि गैरसमज करून घेण्याचें कारण नाहीं.

**संदेश :**

पृ० ३ :—'हां ! ही कोरच' इ० यापुढील कथा प्रसिद्ध पौराणिक कथा आहे. संदर्भानुरोधानें किंचित् फेरफार केला आहे. पुढें आलेली ओळ 'चांद्रमसी ही सुधा' इ० कालिदासाच्या 'सुरद्विषश्चान्द्रमसी सुधेव' या ओळीवरून सूचित आहे.

पृ० ५ :—‘चुन्याखडीचा पायीं ताजमहाल’— ज्याप्रमाणें ताजमहालाच्या हृदयहारी शिल्पाच्या पायाला दगड-चुन्यासारखे कठोर पदार्थच आहेत, त्याप्रमाणें या गुलाबाच्या पांकळ्यांखालीं कठोर कंटक आहे, यांत दुःखकारक असें कांहींच नाहीं; उलट तें सौंदर्यवर्धकच आहे.

पृ० ५ :—‘कथितों तुजला आतां एक कहाणी’ —ही गुलाबाची कहाणी कल्पित आहे. फारसी परिस्तानांतील कथांप्रमाणें रम्याद्‌भुत वातावरणासाठीं ही योजना असली तरी त्यामुळें मूळ जीवनयोगाची त्यागसौंदर्याची कल्पनाहि सुचविली आहे. सबंध काव्यांत त्याचा स्नेह आणि सौंदर्य याचें प्रतीक म्हणून उपयोग केला आहे.

पृ० ८ :—‘तुटती उल्का’ इ० ही घटना काव्यमय प्रतीक आहे. याचाच उल्लेख पुढील ‘मंत्रणा’ विभागांत आला आहे. पुढील त्यागमय जीवनासाठीं नायिकेला ही सूचनाच मिळाली आहे.

मंत्रणा :

पृ० १२ :—‘म्हणुनी नच काव्यमयी’ इ० प्रथम काव्यमय उपपत्ति “अपन्हुती”नें सूचित करून ती न सांगण्याचें कारण मागाहून दुसऱ्या “दृष्टांता”नें स्पष्ट केलें आहे. तिची चमकून वळलेली नजरच जणुं आकाशांत प्रतिबिंबित झाली होती अशी ती “सुंदर” उपपत्ति, पण ती न सांगण्याचें कारण असें कीं, ज्याप्रमाणें व्यजनाकारा (छत्रीच्या आकाराच्या) उषेचें दर्शन घेण्यासाठीं जरी नावाडी हपापला तरी बर्फांतच त्याची होडी अडकल्यामुळें तें सौंदर्यदर्शन त्याला रुचलें नाहीं !

पृ० १७ :—‘कीं अरुंधती’ इ० सप्तर्षि मंडलांतील ताऱ्यांतील अरुंधती अंधुक दिसते व ती उत्तरध्रुवाजवळ उषेच्या सन्निधच असते,

या वस्तुस्थितीवर ही उपमा आधारली आहे. या भागांतील शेवटाचें हें प्रतीक जीवनयोगांतील सेवाभावाचें सूचक आहे.

बंदिवास :

पृ० २१ :—"कोलूदांडा कुरकुर करी...अन् रची काव्य थोर" हा उल्लेख स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या अंदमानांत रचलेल्या "कमला"दि सुंदर काव्यांस उद्देशून आहे.

पृ० २३ :—'जो विज्ञानें गतिमय' इ० भौतिक शास्त्रज्ञांनीं अमर्याद यांत्रिक गतीचा अेक बाण (rocket) मंगळावर सोडल्याचें प्रसिद्धच आहे. पण तो परत आला असला पाहिजे. त्याला उद्देशून हें श्लेषात्मक रूपक आहे. विज्ञान (शास्त्र आणि आत्मज्ञान) यांनीं युक्त असा निश्चययुक्त आदर्शाचा स्वीकार केला असूनसुद्धां तो बाण व मनुष्य अजाणतां परत मूळ मर्यादित अवस्थेंत येतो. "वैकुंठासी गमन" इ० तुकारामाला वैकुंठाला नेण्यासाठीं अंगणांत विमान आलें. तो जिजेला म्हणतो, 'चल!' पण जिजेला दळणकांडणच अधिक आवडतें! मनोवृत्तींचा असाच द्विविध व्यापार चालत असतो.

पृ० २७ :—'करिं दे तें गुलाबी प्रतीक' कैदेंत जातांना तिच्यापाशीं जतन करावयास दिलेला हा गुलाब; त्याला पुढील निराशेच्या काळांतहि चैतन्य देणारें हेंच तें स्मृति-प्रतीक.

दर्शन :

पृ० ३२ :—'परि मीच विमूढ' इ० यांतील 'जरान्विता' शब्द 'आ' प्रत्ययान्त द्वितीयेचा आहे.

पृ० ३३ :—‘गगनीं तिलोत्तमा’—राजा रविवर्म्यानें अप्सरा तिलोत्तमेचें जें सुंदर चित्र काढलें आहे त्याला अनुलक्षून हा उल्लेख आहे.

जीवनयोग :

“जीवनयोग” हा ५ वा खंड आणि मागील खंड यांमध्यें कांहीं वर्षांचें अंतर आहे. या खंडांत नायकाची सध्यांची मनोभूमिका विशद झाली आहे. आणि शेवटीं चालू वर्तमानाचा भूतकाळांतील घटनेशीं संबंध दर्शविला आहे.

नायकाचीं आजचीं मानसिक परिवर्तनें यांत सूचित आहेत. त्याच्यापुढें सुकलेल्या गुलाब-पाकळ्या आहेत, आणि मनांत पत्नीची स्मृति आहे. अर्थात् काळ ‘दर्शना’नंतर कांहीं वर्षांचा आहे.

पृ० ३८ :—‘कुणी म्हणे हा प्रभुनेंच निर्मिला’ येसूच्या धर्मांतील ही कल्पना आहे.

पृ० ३९ :—‘वसुंधरापृष्ठिं विशाल वाढला’ इ० पूर्व गुजरातमध्यें अतिशय प्रसिद्ध कबीर-वड आहे. त्याच्यासंबंधींचें रसमय वर्णन श्री. काकासाहेब कालेलकरांच्या “तीन वड” या (‘लोकशिक्षणां’त अनुवादलेल्या) लेखांत आलेंच आहे.

पृ० ४० :—‘महानुभावी सुविवेकि’ इ० मॅझिनी, रूसो, व्होल्टेअर वगैरेंनीं जी लोकसत्तेची राष्ट्रकल्पना प्रसृत केली तिची विकृति “National Socialism” (म्हणजेच नात्सीवादांत) झाली आहे.